महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या, मुंबई च्या सतत व समवर्ती लेखापरिक्षण याकरीता असलेल्या २६ अस्थायी पदांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मुदतवाढ देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय, क्रमांकः- सपस-२०२३/प्र.क्र.१३/ २४ स**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

दिनांक:- १५ मार्च, २०२४

**वाचा :-**

१ शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : राजस -१००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ०५ सप्टेंबर, २०११

२ शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक : सपस-२०२३/प्र.क्र.१७/२४-स, दिनांक २१ फ़ेब्रुवारी, २०२३

३ सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव जा.क्र.कक्ष-१/आस्था/पणन महासंघ/मुदतवाढ/२७०८/२०२३,

दिनांक २१ डिसेंबर, २०२३

४ शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क,

दिनांक २१ फ़ेब्रुवारी, २०२४

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई येथील सतत व समवर्ती लेखापरिक्षणाकरीता असलेल्या २६ अस्थायी पदांना **दिनांक ३१ ऑगस्ट २०२३** पर्यंत उपरोक्त वाचा (२) मधील शासन निर्णय, **दिनांक २१ फ़ेब्रुवारी, २०२३** नुसार मुदतवाढ देण्यात आली होती. सदर २६ अस्थायी पदांना **दिनांक १ मार्च, २०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४** पर्यंत मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावाला पुढील अटींच्या अधीन राहून शासनाची मंजूरी देण्यात येत आहे :-

कार्यालय प्रमुखाचे पद वगळून उर्वरित सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीकरीता रिक्त असलेली पदे वगळण्यांत यावीत.

१) अस्थायी पदे विहित पध्दतीत भरलेली असावीत.
२) लेखापरिक्षण शुल्काची वसूली पूर्णत: होण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

**दिनांक १ मार्च, २०२४ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२४** पर्यंतच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येणाऱ्या अस्थायी पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | सह निबंधक | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ |
| २ | विशेष लेखापरिक्षक, वर्ग-२ | एस-१५: ४१८००-१३२३०० | ४ |

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| ३ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | एस-१३: ३५४००-११२४०० | ५ |
| ४ | उपलेखापरिक्षक | एस-८: २५५००-८११०० | ५ |
| ५ | कनिष्ठ लिपीक | एस-६: १९९००-६३२०० | १० |
| ६ | शिपाई | एस-१: १५०००-४७६०० | १ |
| | **एकूण** | | **२६** |

२. उपरोक्त अटींचे पालन करण्याची जबाबदारी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी वरील वाढीव मुदतीत पदाचा आढावा घेऊन,सुधारित आकृतीबंधास वित्त विभागाची मान्यता घेण्यासाठी नियोजन करावे.

४. उपरोक्त अस्थायी कर्मचाऱ्यांसाठी होणारा खर्च संबंधित सहकारी पणन संस्थांकडून लेखापरिक्षण शुल्काद्वारे वसुल करण्यात यावा.

५. उपरोक्त बाबींवरील खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत दाखविण्यात येऊन सन २०२४-२५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा:-

**मागणी क्रमांक व्ही-२**

**२४२५-सहकार**

**१०१-सहकारी संस्थांचे लेखापरिक्षण,**

**१०१-(एक)(ए) लेखापरिक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)**

६. सदर शासन निर्णय उपरोक्त नमूद क्र. ४ वरील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१५१९४८०७१४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHAILESH SHASHIKANT SURVE

Digitally signed by SHAILESH SHASHIKANT SURVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=de61ac402ef01eec8d6c6d90fb32c82cc308744e2b851cc16fb39fe7ce1f1dd3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0E8ED2F069FE90F6EA4E2DFC43BD83581600732F141DAF3517043067D7724F4B, cn=SHAILESH SHASHIKANT SURVE
Date: 2024.03.15 19:57:09 +05'30'

**( शैलेश श.सुर्वे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. सह निबंधक ( लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई-९
४. विभागीय सहनिबंधक ( लेखापरिक्षण) (सर्व)

५. जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, मुंबई, नागपूर,औरंगाबाद.
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर,
७. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
८. अधिदान व लेखाअधिकारी, बांद्रा-कुर्ला संकुल, मुंबई
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर, औरंगाबाद,
१०. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, ५ स / १२ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.